२०१५०४२३१५३१०३८९२७

(390)

चिंचवाडी लघु पाटबंधारे योजना,ता.राजापूर, जि.रत्नागिरी या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.लपायो २०१०/ (५५३/१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०४/०७/२०१२

पहावे :- कार्यकारी संचालक,कोकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे,यांचे पत्र क्रकोपाविम/तां-२/चिंचवाडी/(१०/४)/३८९६/सन २०१०/दिनांक ०८.११.२०१०

प्रस्तावना :-

चिंचवाडी लघु पाटबंधारे योजना ता.राजापूर जि.रत्नागिरी या योजनेस शासन निर्णय दि. २८/१०/२००५ अन्वये रु.१७९६.५७ लक्ष किंमतीस प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली होती. प्रशासकिय मान्यतेचा प्रस्ताव तयार करताना सन २००३-०४च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. योजनेच्या खर्चात दरसुचीतील फरक, भू-संपादन खर्चातील वाढ, संकल्पचित्रातील बदल, जादा दराची निविदा स्वीकृती, इतर कारणे व अनुषंगीक खर्चतील वाढ इ. कारणांमुळे वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत कार्यकारी संचालक,कोकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे यांच्याकडून प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता व सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

शासन आता या निर्णयान्वये चिंचवाडी लघु पाटबंधारे योजना योजना ता.राजापूर जि.रत्नागिरी या योजनेचा एकूण अंदाजित खर्च रुपये ३८६८.६४/- लक्ष (रुपये अडोतीस कोटी अडूसष्ट लक्ष,चौसष्ट हजार,फक्त)यास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रु.३५६३.१९/- लक्ष कामाप्रित्यार्थ व रु. ३०५.४५ /- लक्ष अनुषंगिक खर्च आहे. अंदाजपत्रकात कामासाठी सन २००९-१० या वर्षाच्या दरसुची प्रमाणे दर वापरण्यात आले आहे. उपशिर्षवार तरतुदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

१. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५ "४७०२ लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुतवणुक (००)(०२)" कोकण पाटबंधारे विकास

महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०२ ४९०९) या शीर्षाखाली खर्ची घालावा व अनुदानातून भागविण्यात यावा.

२. सदरहू प्रकल्पाचे संपूर्ण काम नाबार्ड १५ अंतर्गत काम पूर्ण होतील या अटीस अधीन राहून प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरहू प्रशासकिय मान्यतेचा शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र .४३८/१२ दि. १२/१२/२०११ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३५३, दि.०९/०२/१२ च्या अनुषंगाने व आंतर वित्त सल्लागार यांच्या सहमतीने प्रदान करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता अनुक्रमांक (१९/२०१२) वर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु.स.डांगळे )
शासनाचे कक्ष अधिकारी

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यासह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
मुख्य अभियंता (दवप्र) व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
अधीक्षक अभियंता,उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मडळ,कळवा-ठाणे
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अपर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता,लघु पाटबंधारे विभाग,चिपळूण
उपअभियंता (खारभूमी) मंत्रालय, मुंबई
अर्थशाखा १/२(२ प्रती) / लपा-१ जलसंपदा विभाग,
जिल्हाधिकारी, नाशिक
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्राल,मुंबई
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक लपायो २०१०/(५५३/२००७)/खारभूमी दिनांक ०४/०७/२०१२ चे सहपत्र

चिंचवाडी पाटबंधारे योजना ता.राजापूर, जि.रत्नागिरी, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| क्रमांक | शिर्ष / उपशिर्ष | रक्कम (रुपये लक्ष) | | एकूण रुपयात |
|---|---|---|---|---|
| | | मुख्य शिर्षकामे | मुख्य व शाखा कालवे | |
| १ | 'ए' प्राथमिक | १८.८२ | ११.९६ | ३०.७८ |
| २ | 'बी' (भूसंपादने) | ४८३.९१ | २४.७७ | ५०८.६८ |
| ३ | 'सी' मुख्य कामे | १९९४.३४ | ०.०० | १९९४.३४ |
| ४ | 'डी' विमोचक | ३०१.४४ | ३.४९ | ३०४.९३ |
| ५ | 'ई'-प्रपात | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ६ | 'एफ' आरएचटी वर्क्स | ०.०० | १९६.२५ | १९६.२५ |
| ७ | 'जी' पूल (सीटी क्रॉसिंग) | ०.०० | ९९.५५ | ९९.५५ |
| ८ | 'एच' एस्केप | ०.०० | १.०० | १.०० |
| ९ | 'के' इमारती | ३.०० | २.०० | ५.०० |
| १० | 'एल मातीकाम | ०.०० | २९०.१० | २९०.१० |
| ११ | 'एम' वृक्षारोपन | ०.३१ | ४.०१ | ४.३२ |
| १२ | 'ओ' संकीर्ण | ४.१३ | ४.४१ | ८.५४ |
| १३ | 'पी' देखभाल | ८.७९ | १.०८ | ९.८७ |
| १४ | 'आर' दळणवळण | ८४.५३ | २.६५ | ८७.१८ |
| १५ | | १.०० | ०.०० | १.०० |
| १६ | वितरिका | ०.०० | २१.६५ | २१.६५ |
| | कामाप्रित्यर्थ किंमत | २९००.२७ | ६६२.९२ | ३५६३.१९ |
| | अनुषंगिक खर्च | | | **३०५.४५** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत रू लक्ष** | | | **३८६८.६४** |

| **ठळक वैशिष्टये** | |
|---|---|
| नियोजित सिंचन क्षेत्र | ३९० हे. |
| नियोजित पाणीसाठा | ६.३९ द.ल.घ.मी. |
| पाण्यासाठीची प्रती स.घ.मी. किंमत (रू) | ६०५४२ < महत्तम मापदंड |
| | ----- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.२४ > १ लघुत्तम मापदंड |